(सोबत, स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेच्या अंमलबजावणीचा मार्च,२०११ अखेरीच्या मासीक प्रगती अहवालाची विश्लेषणात्मक टिप्पणी )

क्रमांक: संकीर्ण-२०११/प्र.क्र.१३६/योजना-३.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १२ मे, २०११

प्रति,

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
जिल्हा परिषद तथा अध्यक्ष,कार्यकारी समिती,
जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,

सर्व प्रकल्प संचालक,
जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,

उप आयुक्त (विकास),
विभागीय आयुक्तांचे कार्यालय
कोकण, मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर

अप्पर संचालक,
एकात्मिक ग्रामीण विकास कक्ष,
ग्राम विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

आवश्यक त्या माहिती व तातडीच्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०११०५०७१४४३७००१** असा आहे.

( रा. शं. नागरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

D:\data\c disk\SGSY-Revew of MPR-Revew of MPR- March-2011.lwp6

## स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेच्या अंमलबजावणीचा मार्च, २०११ अखेरीचा मासीक प्रगती अहवालाचे विश्लेषण.

सदर विश्लेषण जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांचेकडून प्राप्त झालेल्या विहीत नमुन्यातील मासीक प्रगती अहवालाच्या आधारे करण्यात आले आहेत.

**केंद्र शासनास ऑनलाईन रिपोर्टींग करणे :-**

अमरावती, हिंगोली, नांदेड, सिंधुदूर्ग व यवतमाळ या जिल्हयांनी विहीत वेळेत केंद्र शासनास ऑनलाईन रिपोर्टींग केलेले नाही.

तसेच, वाशिम, गडचिरोली, नांदेड व रत्नागिरी या जिल्ह्यांनी शासनाने वारंवार पाठपुंरावा करुनही विहीत वेळेत मासीक प्रगती अहवाल सादर केला नाही. याबाबत त्यांचे विरुध्द शिस्तभंगाची कारवाई का करु नये, याबाबतचा खुलासा मागितला आहे.

अ) **आर्थिक प्रगती** :-

**खर्च** :- मार्च, २०१०-११ अखेरीस राज्यास खर्चासाठी एकूण रु.२५८९१.९३ लाख उपलब्ध होते. त्यातून रु.२५३२४.०२ लाख खर्च करण्यात आला. त्याची उपलब्ध निधीच्या अनुषंगाने

टक्केवारी ९८% इतकी येते. राज्याच्या सरासरीपेक्षा सोलापूर, बुलढाणा, अकोला, नागपूर व गोंदिया या जिल्ह्यांचा खर्च कमी झाला आहे.

या जिल्ह्यांनी खर्च कमी होण्याची कारणे शोधून त्यावर भविष्यात केलेली उपाययोजना शासनास कळवावी.

**अनुदान वाटप** :- राज्यामध्ये एकूण रु.१६५६८.०० लाख इतके अनुदान वाटप करण्यात आले. वाशिम जिल्हा (९१%) वगळता उर्वरित जिल्हयांनी १००% व त्यापेक्षा जास्त उद्दीष्ट साध्य केले आहे.

याबाबत वाशिम जिल्हयाने परिक्षण करुन पुढील वर्षासाठी योग्य नियोजन करावे.

. **मुलभूत सुविधांवरील खर्च :-** योजनेमध्ये मुलभूत सुविधांसाठी एकूण नियतव्ययाच्या २०% निधी खर्च करावयाचा आहे. त्यानुसार सन २०१०-११ मध्ये एकूण रु. ४९९८.४० लाख इतके उद्दीष्ट होते. प्रत्यक्षात रु.३९६३.९० लाख खर्च झाला. खर्चाची टक्केवारी ७९% इतकी येते.

यामध्ये सातारा (४०%), सांगली (३३%), जालना (५%), बीड (७७%),उस्मानाबाद (५%),, लातूर (२९%),वाशिम (२%),वर्धा (५३%),भंडारा (६०%),व गडचिरोली (३८%), या जिल्ह्यांचे साध्य अतिशय नगण्य आहे.

या नगण्य साध्याबाबत संबंधित जिल्ह्यांनी खुलासा करावा.

**पतपुरवठा वितरण** :- केंद्र शासनाचे सन २०१०-११ मध्ये रु. ४११७९.०५ लाख इतके पतपुरवठयाचे उद्दीष्ट दिले होते. प्रत्यक्षात रु.३६९५२.७१ लाख इतके उद्दीष्ट साध्य झाले. त्याची टक्केवारी ९०% इतकी येते.

या एकूण टक्केवारीपेक्षा ठाणे (६१%), रत्नागिरी (४६%), सिंधुदूर्ग (७०%),धुळे (७४%), सोलापूर (८२%), औरंगाबाद (७४%), जालना (७९%), बीड(८७%), उस्मानाबाद (८४%), बुंलढाणा (६३%), अकोला (५७%), वाशिम (४९%), अमरावती (७९%), यवतमाळ (८९%), वर्धा (६६%), नागपूर (८३%), गोंदिया (७५%), चंद्रपूर (८०%) व गडचिरोली (८९%) या जिल्ह्यांनी कमी साध्य केले आहे.

याबाबत संबंधित जिल्हयांनी खुलासा करावा.

ब) **भौतिक प्रगती** :-

**स्वयंसहायता गट स्थापना** :- सन २००१०-११ मध्ये राज्यात एकूण १४७५६ स्वयंसहायता गट स्थापन करण्यात आले असून २२४३७ गटांनी वर्गवारी एक व १६३३७ गटांनी वर्गवारी दोन पार केली असून १४४६५ गटांनी आर्थिक उपक्रम सुरु केले आहेत. एकूण स्थापित गटांमध्ये १३६६३ महिलांचे गट असून उपक्रम सुरु केलेले महिलांचे गट १३५८७ इतके आहेत.

**वैयक्तीक व गटातील एकूण स्वरोजगारींना सहाय्य** :- सन २०१०-११ मध्ये केंद्र शासनाने यासाठी एकूण १७४६०९ स्वरोजगारींचा सहाय्य करावयाचे उद्दीष्ट दिले होते. त्यानुसार, एकूण १७४७३३ स्वरोजगारींना सहाय्य करण्यात आले. त्याची टक्केवारी १००% इतकी येते.

रायगड, जळगांव, अहमदनगर, पुणे, सातारा, सांगली, सोलापूर, कोल्हापूर, जालना, परभणी, हिंगोली, उस्मानाबाद, यवतमाळ, वर्धा, नागपूर, गोंदिया व चंद्रपूर या जिल्ह्यांनी उत्तमरित्या उद्दीष्ट साध्य केले आहे. उर्वरित जिल्ह्यांनी राज्याच्या सरासरीपेक्षा कमी उद्दीष्ट साध्य केले आहे.

पुढील वर्षात सदर उद्दीष्ट पूर्ण करण्याच्या दृष्टीने सुरुवातीपासून नियोजन करण्यात यावे.

**अनुसूचित जाती/जमाती स्वरोजगारींना सहाय्य :-** योजनेसाठीच्या मार्गदर्शक तत्वानुसार एकूण लाभार्थ्यांपैकी ५०% लाभार्थी अनुसूचित जाती/जमातीचे असणे आवश्यक आहे. त्यानुसार सन २०१०-११ मध्ये अनुसूचित जाती/जमाती प्रवर्गासाठी एकूण ८७३०५ लाभार्थ्यांना सहाय्य करण्याचे उद्दीष्ट विहीत करण्यात आले होते. त्यानुसार या कालावधीत

अनुसूचित जाती प्रवर्गातील एकूण ४१६९८ (४८%) व अनुसूचित जमाती प्रवर्गातील एकूण ३९५५८ (४५%) अशा एकूण ८१२५६ लाभार्थ्यांना सहाय्य करण्यात आले. त्याची टक्केवारी ९३% इतकी येते.

राज्याच्या सरासरी टक्केवारीपेक्षा रत्नागिरी (२७%), सिंधुदूर्ग(३८%), धुळे (८४%), सातारा (३२%), सोलापूर (७२%), कोल्हापूर (६४%), जालना (७१%), परभणी (४२%), बीड (४६%), नांदेड (७३%), उस्मानाबाद (७०%), लातूर (८९%), बुलढाणा (७२%), अकोला (७३%), वाशिम (६७%), नागपूर (७२) भंडारा (४०%) या जिल्ह्यांनी कमी साध्य केले आहे.

याबाबत जिल्ह्यांनी परिक्षण करुन पुढील वर्षीचे उद्दीष्ट पूर्णपणे साध्य करण्याच्यादृष्टीने नियोजन करावे.

**महिला स्वरोजगारींना सहाय्य** :- योजनेसाठीच्या मार्गदर्शक तत्वानुसार एकूण लाभार्थ्यांपैकी ४०% लाभार्थी महिला प्रवर्गातील असणे आवश्यक आहे. त्यानुसार सन २०१०-११ मध्ये महिला प्रवर्गासाठी एकूण ६९८४४ महिला लाभार्थ्यांना सहाय्य करण्याचे उद्दीष्ट विहीत करण्यात आले होते. त्यानुसार, राज्यामध्ये एकूण १४४९६७ महिला स्वरोजगारींना सहाय्य करण्यात आले. त्याची एकूण टक्केवारी, २०८% इतकी आहे.

यामध्ये राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये १००% पेक्षा जास्त उद्दीष्ट साध्य केले आहे.

**अपंग स्वरोजगारींना सहाय्य** :- योजनेसाठीच्या मार्गदर्शक तत्वानुसार एकूण लाभार्थ्यांपैकी ३% लाभार्थी अपंग प्रवर्गातील असणे आवश्यक आहे. त्यानुसार सन २०१०-११ मध्ये अपंग प्रवर्गासाठी एकूण ५२३८ अपंग लाभार्थ्यांना सहाय्य करण्याचे उद्दीष्ट विहीत करण्यात आले होते. त्यानुसार,

राज्यामध्ये एकूण ३२२० अपंग स्वरोजगारींना सहाय्य करण्यात आले. त्याची एकूण टक्केवारी ६१% इतकी आहे. साध्याचे प्रमाण अत्यंत कमी असून याबाबत राज्याची प्रगती समाधानकारक दिसून येत नाही.

ठाणे (१२६%), रायगड (१००%), पुणे (१०७%), अमरावती (१०५%), यवतमाळ (१०३%), हे जिल्ह्ये वगळता अन्य जिल्ह्यांनी समाधानकारक उद्दीष्ट पुर्तता केलेली नाही. विशेषत: नाशिक (२३%),नंदूरबार (५%), अहमदनगर (२६%), सातारा (४५%), बीड (३१%), नांदेड (२२%),अकोला (१०%), वाशिम (२३%), नागपूर (८%), भंडारा (१३%), गोंदिया (५%),चंद्रपूर (४४%),गडचिरोली (२९%) इतके नगण्य उद्दीष्ट साध्य केले आहे. यापुढे राज्याची एकूण टक्केवारी अत्यंत कमी झाली आहे.

याबाबत जिल्ह्यांनी आपला सविस्तर अहवाल सादर करावा.

**अल्पसंख्याक स्वरोजगारींना सहाय्य** :- सन २०१०-११ मध्ये केंद्र शासनाने अल्पसंख्यांक प्रवर्गातील एकूण २६१९१ लाभार्थ्यांना सहाय्य करण्याचे उद्दीष्ट दिले होते. प्रत्यक्षात १६८१९ अल्पसंख्यांक लाभार्थ्यांना सहाय्य करण्यात आले. त्याची टक्केवारी ६४% इतकी आहे.

वर्षाच्या सुरुवातीसच व वर्षभराच्या काळात शासनस्तरावर झालेल्या बैठकीमध्ये जिल्ह्यातील अल्पसंख्यांक लाभार्थ्यांचा सर्वेकरुन एकूण लाभार्थी- सहाय्य केलेले लाभार्थी व अद्यापी सहाय्य करावयाचे शिल्लक लाभार्थी याबाबतची जिल्हानिहाय माहिती शासनास सादर करण्याच्या सूचना देण्यात आल्या होत्या. जेणेकरुन जिल्ह्यांच्या उद्दीष्टांमध्ये बदल करुन एकूण उद्दीष्टाबाबत केंद्र शासनास अवगत करता आले असते. तथापि, सदर माहिती प्राप्त न झाल्याने ही कार्यवाही करता आली नाही व साध्याचे प्रमाण शासनस्तरावर कमी दिसून येत आहे.

यामध्ये अहमदनगर, पुणे, कोल्हापूर, जालना, परभणी, हिंगोली, नांदेड, बुलढाणा, वाशिम व यवतमाळ हे जिल्ह्ये वगळता अन्य जिल्यांचे साध्याचे प्रमाण कमी आहे. विशेषत: ठाणे (२१%), रायगड (३३%), रत्नागिरी (२८%), नाशिक (१२%), नंदूरबार (१७%), सातारा (३२%), वर्धा (३५%), नागपूर (२३%), भंडारा (१०%), गोंदिया (१०%),चंद्रपूर (९%), गडचिरोली (६%), या जिल्हयांची प्रगती किमान ५०% इतकीही नाही.

या जिल्ह्यांनी आपला खुलासा शासनास सादर करावा.

तसेच वरील प्रमाणे सर्वे करुन उपयुक्त (विकास) यांचे मार्फत माहिती पाठवावी.

***-*-*-*-*-*-*-***